**१०० क्षमतेचे मागासवर्गीय मुलांचे शासकीय वसतिगृह, अर्जुनी मोरगाव जि.गोंदिया या वसतिगृहाच्या इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बीसीएच-२०१९/प्र.क्र.२०/ बांधकामे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०५ ऑक्टोबर, २०२१.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. बीसीएच-२००५/प्र.क्र.५५४/मावक-४, दि. २८/६/२००७.
२) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. सकआ/शिक्षण/मुलींचेशावगृ/इ.बा.अ./२०१५-१६/२९११, दि.१९/१२/२०१५
३) शासन ज्ञापन, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,क्र. बीसीएच-२०१६ / प्र.क्र.१/बांधकामे, दि.३१/३/२०१६
४) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र. सकआ/ शिक्षण/ अर्जुनी मोर/ मुलांचे शावगृ/बांधकाम/का-५/२०१८-१९/२६२, दि.३/१/२०१९.

प्रस्तावना :-

मागासवर्गीय मुलांमुलींसाठी नवीन १०० शासकीय वसतिगृहे आणि विभागीय स्तरावर मागासवर्गीय मुलामुलींसाठी १००० विद्यार्थी क्षमतेचे नवीन शासकीय वसतीगृहे सुरू करण्यास मान्यता देण्यात आली आहे.त्यानुषंगाने विभागाच्या दि.३१/३/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये मागासवर्गीय मुलांचे शासकीय वसतिगृह,अर्जुनी मोरगाव, जि. गोंदिया या वसतिगृहाच्या इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. आता, आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी दि.३/१/२०१९ रोजीच्या पत्रान्वये १०० क्षमतेचे मागासवर्गीय मुलांचे शासकीय वसतिगृह, अर्जुनी मोरगाव या वसतिगृहाच्या सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव शासनास केला आहे. उपरोक्त सुधारीत अंदाजपत्रकाचा प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाकडे तांत्रिक बाबींची तपासणी व प्रशासकीय मान्यतेस सहमती दर्शविण्याकरीता पाठविण्यात आला असता सार्वजनिक बांधकाम विभागाने रू.१३,४७,३०,२४५/- (अक्षरी रूपये तेरा कोटी सत्तेचाळीस लक्ष तीस हजार दोनशे पंचेचाळीस फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास सहमती दर्शविली आहे. त्यानुषंगाने सुधारीत अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयुक्त समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांनी सादर केलेला १०० क्षमतेचे मागासवर्गीय मुलांचे शासकीय वसतिगृह, अर्जुनी मोरगाव जि.गोंदिया या वसतिगृहाच्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाकडे तांत्रिक बाबींची तपासणी करीता पाठविण्यात आली असता सार्वजनिक बांधकाम विभागाने सदर प्रस्तावातील सुधारित प्रशासकीय मान्यतेची किमंत खालील प्रमाणे परिगणीत करण्यात आलेली आहे.

| अ.क्र. | बाब | मुळ प्रशासकीय मान्यता | सुधारित प्रशासकीय मान्यता | फरक | अधिक्याची कारणे |
|---|---|---|---|---|---|
| अ. | १.इमारत बांधकाम (आकस्मिक खर्चासह) | २,९५,००,३८०/- | ६,४३,७५,०७०/- | ३,४८,७४,६९०/- | १०० मुलांचे वसतिगृहाचे सुधारित आराखड्यामुळे जोते क्षेत्रफळ वाढल्यामुळे व दरसूचीमध्ये वाढ झाली आहे |
| | २.नवीन बाबी | १,३९,०८,८३४/- | ५,५०,५५,१६३/- | ४,११,४६,३२९/- | |
| | **एकूण अ** | **४,३४,०९,२१४/-** | **११,९४,३०,२३३/-** | **७,६०,२१,०१९/-** | |
| **ब.** | **विद्युत** | | | | १०० मुलांचे वसतिगृहाचे सुधारित आराखड्यामुळे जोते क्षेत्रफळ वाढल्यामुळे व दरसूचीमध्ये वाढ झाली आहे |
| | १.मुळ बाबी | ३२,४५,०४२/- | ७०,८१,२५८/- | ३८,३६,२१६/- | |
| | २.नवीन बाबी | १०,००,०००/- | ४०,००,०००/- | ३०,००,०००/- | |
| | **एकूण ब** | **४२,४५,०४२/-** | **१,१०,८१,२५८/-** | **६८,३६,२१६/-** | |
| **क** | **पाणीपुरवठा** | | | | १०० मुलांचे वसतिगृहाचे सुधारित आराखड्यामुळे जोते क्षेत्रफळ वाढल्यामुळे व दरसूचीमध्ये वाढ झाली आहे |
| | १.मुळ बाबी | १४,७५,०१९/- | ३२,१८,७५४/- | १७,४३,७३५/- | |
| | २.नवीन बाबी | ६,००,०००/- | १०,००,०००/- | ४०,००,०००/- | |
| | **एकूण क** | **२०,७५,०१९/-** | **४२,१८,७५४/-** | **२१,४३,७३५/-** | |
| | **एकूण (अ+ब+क)** | **४,९७,२९,२७५/-** | **१३,४७,३०,२४५/-** | **८,५०,००,९७०/-** | **% अधिक्य** |

२. उपरोक्त विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणीत केल्यानुसार रू.१३,४७,३०,२४५/- (अक्षरी रूपये तेरा कोटी सत्तेचाळीस लक्ष तीस हजार दोनशे पंचेचाळीस फक्त) इतक्या रकमेच्या सुधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रस्तुत शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) सदर काम सुधारित प्रशासकीय मान्यता दिलेल्या रकमेतच पूर्ण करणे अनिवार्य राहील.

२) तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याचे साक्षांकन घेण्यात यावे.

३) मुळ प्रशासकीय मान्यता आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोर पालन करण्यात यावे.

३. सदर १०० क्षमतेचे मागासवर्गीय मुलांचे शासकीय वसतिगृह,अर्जुनी मोरगाव येथील वसतिगृहाच्या सुधारित अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त करून, विहित नियमानुसार अटी व शर्ती निश्चित करून ई-निविदा प्रसिध्द करण्याची कार्यवाही कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, गोंदिया यांनी तात्काळ करावी.

४. या वर होणारा खर्च मागणी क्र. एन-४, मुख्य लेखाशिर्ष ४२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती आणि इतर मागासवर्ग यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च, २७७-शिक्षण, पंचवार्षिक योजनां अंतर्गत योजना-रराज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०३) मागासवर्गीय मुलांमुलींसाठी शासकीय वसतीगृह बांधणे (४२२५ ०४८१), ५३-मोठी बांधकामे या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२११००६११४९१८५६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, serialNumber=fd9b93035f4da174c04fa71634fe1f6aa493c78a5335f985651f937888df7a89, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2021.10.06 11:50:41 +05'30'

(अनिल कों. आहिरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त, समाजकल्याण, पुणे.
२) उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,नागपूर.
५) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, गोंदिया/नागपूर
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,गोंदिया/पुणे

७) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
८) प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग,नागपूर.
९) सहायक आयुक्त, समाजकल्याण, गोंदिया.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, गोंदिया/नागपूर/पुणे.
११) निवडनस्ती (बांधकामे).